# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्प) अधिवेशन, २०१८

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

**राज्यात शहरांमध्ये वाहतुक व पार्किंगची सुविधा पुरविण्याबाबत**

**(१) १८१२ (२२-०१-२०१५). डॉ.सुधीर तांबे, श्री.संजय दत्त, श्री.विक्रम काळे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वाढत्या लोकसंख्येप्रमाणेच राज्यात वाहनांची संख्याही झपाटयाने वाढत असून दररोज सुमारे १३०० वाहने राज्यभरातील विविध रस्त्यावर धावत असून राज्याच्या आर्थिक पाहणी अहवालानुसार वाहनांची संख्या २ कोटी १० लाखावर गेली असून मुंबई, ठाणे, पुणे यासारख्या मोठया शहरांमध्ये वाहतुकीची आणि पार्किंगचा प्रश्न जटील होत असल्याचे माहे जुलै, २०१४ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यात वाढत्या वाहनांच्या संख्येमुळे मोठया शहरांमध्ये वाहतुकीचा आणि पार्किंगचा प्रश्न सोडविण्यासाठी शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(३) अद्याप, उक्त प्रश्नाबाबत कोणतीच उपाययोजना करण्यात आली नसल्यास विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-०१-२०१८) :** (१) व (२) वाढत्या नागरीकरणामुळे तसेच वाढत्या वाहन संख्येमुळे शहरामध्ये निर्माण होणारा वाहतुकीचा आणि पार्किंगचा प्रश्न सोडविण्यासाठी पोलीस प्रशासनाची वाहतुक शाखा व महानगरपालिकांच्या समन्वयाने खालील उपाययोजना केल्या जातात :

अ) एकेरी मार्ग वाहतुक

ब) सम-विषम तारखांना पार्किंग

क) सशुल्क व मोफत वाहनतळ सुविधा

ड) नो पार्किंग झोन

इ) सार्वजनिक वाहतुकीकरिता विशेषीकृत मार्गिका,

ई) वाहतुक नियमनाकरिता ट्रॅफिक वार्डन नियुक्ती

फ) पादचारी मार्ग/पुल/भुयारी मार्ग

ग) सिग्नल यंत्रणा

ह) ठराविक ठिकाणी प्रवेश बंदी उदा. अवजड वाहनाना ठराविक रस्त्यांवर मर्यादित अथवा कायम स्वरुपी प्रवेश बंदी

तसेच सार्वजनिक वाहतुक व्यवस्था सक्षमीकरणासाठी महानगरपालिका प्रयत्नशील आहेत

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## विद्यार्थ्यांची शैक्षणिक गुणवत्ता वाढविण्यासाठी शाळांमध्ये गुणवत्ता कक्षाची स्थापना करणेबाबत

**(२) ६४६६ (२०-०४-२०१५). श्री.नरेंद्र पाटील, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.सुनिल तटकरे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) विद्यार्थ्यांची शैक्षणिक गुणवत्ता वाढविण्यासाठी राज्य शासन विविध माध्यमातून प्रयत्न करीत असून, त्यासाठी शाळा आणि स्थानिक यंत्रणा यांच्याशी संवाद साधुन ठोस उपाययोजना करण्यासाठी शैक्षणिक गुणवत्ता कक्षाची स्थापना करण्याचे निर्देश शासनाने दिनांक २४ जुलै, २०१४ रोजी अध्यादेशाद्वारे दिलेले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शिक्षणाची गुणवत्ता वाढावी आणि प्रत्येक विद्यार्थ्यांस दर्जेदार गुणवत्तापुर्ण शिक्षण मिळावे यासाठी शाळांमध्ये गुणवत्ता कक्षाची स्थापना करावी व त्याचा लेखी अहवाल सादर करावा असे आदेश राज्यातील शिक्षण निरिक्षकांनी सर्व मान्यता प्राप्त माध्यमिक शाळांच्या मुख्याध्यापकांना दिलेले आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर प्रकरणाची अंमलबजावणी राज्यातील अनेक माध्यमिक शाळांनी केलेली नसल्याचे माहे फेब्रुवारी, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, राज्यातील किती संस्थांची आतापर्यंत आपले अहवाल शासनास सादर केले असून, अद्याप किती संस्थाकडून अहवाल प्राप्त होणे बाकी आहे,
(५) संबधित संस्थांनी शासनाच्या आदेशाची अंमलबजावणी केली नसल्यास सदर संस्थेवर शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०६-०१-२०१८) :** (१) हे खरे आहे. दिनांक २४ जुलै, २०१४ च्या शासन परिपत्रकान्वये शैक्षणिक गुणवत्ता कक्षाची स्थापना करणेबाबत निर्देश दिले आहेत.
(२) हे खरे आहे.
(३) हे अंशत: खरे आहे.
(४) कोल्हापूर विभाग वगळून इतर सर्व विभागांची माहिती प्राप्त झाली आहे.
(५) शैक्षणिक गुणवत्ता कक्षाची स्थापना करण्याबाबत संबंधित शाळांना सूचना देण्यात आलेल्या आहे.
(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## एमएसआरडीसीला वित्त पुरवठा करण्याबाबत

**(३) ९५३४ (२९-०७-२०१५). ॲड.अनिल परब, डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) एमएसआरडीसीला शासनाकडून वेळेत वित्त पुरवठा होत नसल्याने त्यांना पत टिकवून ठेवण्यासाठी कर्ज घ्यावे लागत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, एमएसआरडीला रुपये ६८९० कोटी तोटा झाला असून शासनाच्या दिरंगाईमुळे या महामंडळाला ५२६२ कोटीचे व्याज विनाकारण द्यावे लागत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, त्यामुळे महामंडळाची बाजारात पत उरली नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर महामंडळाला पूर्व पदावर आणण्यासाठी शासनाने कोणत्या उपाययोजना केल्या आहेत, वा करण्यात येत आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१०-०१-२०१८) :** (१) अंशत: हे खरे आहे.

मंजूर प्रकल्पांची अमंलबजावणी करण्यासाठी महामंडळाकडून कर्ज घेण्यात येते.

(२) हे खरे नाही.

कर्ज/ कर्जरोख्यांची परतफेड केल्यानंतरही महामंडळचा रोकड प्रवाह सकारात्मक आहे.

(३) हे खरे नाही.

(४) महाराष्ट्र शासन व इतर शासन संस्थाकडून वेगवेगळ्या प्रकल्पांकरिता अनुदान देय आहे. हे अनुदान महामंडळास उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही शासनस्तरावर सुरु आहे.

---

**राज्यात एस.टी. बस गाड्यांना स्वयंचलित आग प्रतिबंधक प्रणाली बसविणेबाबत**

**(४) १९६९० (१६-०८-२०१६). डॉ.अपूर्व हिरे :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यभरात दोन वर्षाच्या कालावधीत १९ बस गाड्यांच्या इंजिनने पेट घेतल्यामुळे आगी लागल्याच्या घटना घडल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यामुळे प्रवाशांचे जिवीत धोका असल्याने एस.टी.विभागाने स्वयंचलित आग प्रतिबंधक प्रणाली बसविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे काय, उक्त प्रणाली केव्हापासून कार्यान्वित होणे अपेक्षित आहे,

(३) असल्यास, प्रवाशांच्या सुरक्षिततेच्यादृष्टीने एस.टी. बसगाड्यांच्या अतिवेगावर नियंत्रण आणणे, चालकांचे वेळोवेळी समुपदेशन करणे आणि आरोग्य विषयक वैद्यकीय तपासण्या व अन्य प्रतिबंधात्मक व सुरक्षितेसंबंधी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (०५-१२-२०१७) :** (१) राज्य परिवहन महामंडळाच्या गत २ वर्षे ८ महिने या कालावधीत १९ वाहनांना आग लागण्याच्या घटना घडलेल्या आहेत. सदर घटना मुख्यत: शॉर्ट सर्किटमुळे घडलेल्या आहेत.

(२) राज्य परिवहन महामंडळाने स्वयंचलित आग प्रतिबंधक प्रणाली बसविण्याबाबतची चाचणी घेण्याचे प्रायोजित केले असून, सदर चाचणी यशस्वीरित्या पूर्ण झाल्यानंतर पुढील कार्यवाही करण्यात येईल.

(३) सन २०१३ ते २०१५ या कालावधीत ९१७० चालकांचे समुपदेशन करण्यात आले आहे. तसेच माहे एप्रिल, २०१५ ते सप्टेंबर, २०१६ या कालावधीत ४० वर्षावरील चालकांची वैद्यकीय तपासणी करण्यात आली आहे.

राज्य परिवहन महामंडळाच्या वाहनांच्या वेग नियंत्रणाबाबत व सुरक्षितेबाबत राज्य परिवहन महामंडळाच्यास्तरावर वेळोवेळी कार्यवाही करण्यात येते.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मालेगांव (जि.नाशिक) बॉम्बस्फोट प्रकरणातील आरोपींना राष्ट्रीय तपास यंत्रणेने दोषमुक्त केल्याबाबत

**(५) २०००१ (२४-०८-२०१६). श्री.कपिल पाटील, श्री.संजय दत्त, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मालेगांव (जि.नाशिक) बॉम्बस्फोट प्रकरणाचा दहशतवाद विरोधी पथकाचे हेमंत करकरे यांच्या काळात योग्य तपास झाला होता हा तपासच चुकीचा असल्याचे दर्शवून या प्रकरणातील आरोपी प्रज्ञा ठाकूर आणि कर्नल पुरोहित यांना राष्ट्रीय तपास यंत्रणा (एनआयए) यांनी दोषमुक्त केल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी भक्कम पुरावे असताना संशयितांना दोषमुक्त करण्याचा निर्णयास निधर्मी संघटनेने विरोधी करून जनआंदोलन करण्याचा इशारा दिला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मालेगाव बॉम्बस्फोट प्रकरणी राष्ट्रीय तपास यंत्रणेच्या निर्णयाबाबत हरकत नोंदवून आपली भूमिका स्पष्ट करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-०१-२०१८) :** (१) व (२) दहशतवाद विरोधी पथकाने सदर गुन्ह्यास मोका कायद्याच्या तरतुदी लागू करुन एकूण १२ आरोपींना अटक करुन मोक्का न्यायालयात दोषारोप पत्रे दाखल केली आहेत.

सन २०११ मध्ये सदर गुन्हा पुढील तपासाकरीता एनआयएकडे वर्ग करण्यात आला असून दिनांक १३/०५/२०१६ रोजी एनआयएने नमूद गुन्हयात पुरवणी दोषारोप पत्र दाखल केले आहे.

मोक्का कोर्टाने एनआयएच्या अहवालानंतर कोणत्याही आरोपीस गुन्ह्यातून दोषमुक्त केलेले नाही.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

## मौ.कुंडलवाडी (ता.बिलोली, जि.नांदेड) येथील दुरवस्थेत असलेल्या बसस्थानकाची दुरूस्ती करण्याबाबत

**(६) २००११ (१६-०८-२०१६). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौ.कुंडलवाडी (ता.बिलोली, जि.नांदेड) येथील बसस्थानक अत्यंत दुरवस्थेत असून बसस्थानकात प्रवाशांना बसण्यासाठी बाकडे नसल्याने प्रवाशांची मोठया प्रमाणात गैरसोय होत असल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार सदर दुरवस्थेत असलेले बसस्थानकाची दुरूस्ती करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (०५-१२-२०१७) :** (१) व (२) नाही.

बसस्थानकामध्ये प्रवाशांना बसण्यासाठी बाकडे असून ते सुस्थितीत आहेत. प्रतिक्षालयात प्रवाशांना बसण्यासाठी आसन व्यवस्था, लाईट व पंखे आहेत. प्रवाशांची कोणत्याही प्रकारे गैरसोय होत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील दुष्काळग्रस्ताकरीता उपाययोजना करण्याबाबत

**(७) २०३२५ (१९-०८-२०१६). श्री.रामहरी रुपनवर, श्री.संजय दत्त, श्री.शरद रणपिसे, श्री.हरिसिंग राठोड, श्री.सुभाष झांबड, श्री.चंद्रकांत रघुवंशी, श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात अनेक भागात भीषण दुष्काळ परिस्थिती असून २९ हजार ६०० गावांमध्ये दुष्काळ जाहिर केल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दुष्काळी परिस्थितीचा सामना करण्यासाठी शासनाकडून कोणत्या योजना राबविण्यात आल्या आहेत तसेच मराठवाड्यासाठी दीर्घकालीन उपाययोजना करण्याची सूचना देऊनही अद्यापपर्यंत कोणतीच कार्यवाही करण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, दुष्काळी स्थितीचा सर्वसाधारण तपशिल काय आहे,

(४) असल्यास, दुष्काळग्रस्ताकरीता उपाययोजनांसाठी किती निधीची आवश्यकता आहे व प्रत्यक्षात किती निधी, कशाप्रकारे व केव्हा उपलब्ध करून देण्यात येणार आहे ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०५-०१-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एससीवाय-२०१५/ प्र.क्र.३११/म-७, दिनांक २० ऑक्टोबर, २०१५ अन्वये खरीप २०१५-१६ च्या खरीप हंगामातील पैसेवारी ५० पैशांपेक्षा कमी असलेल्या १५७४७ व शासन निर्णय क्रमांक : एससीवाय-२०१६/प्र.क्र.१/म-७, दिनांक २३ मार्च, २०१६ अन्वये ११८६२ गावांमध्ये दुष्काळ परिस्थिती घोषित करून जमीन महसुलात सुट, कृषि पंपाच्या चालू वीज देयकात ३३.५% सुट, शालेय/महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या परीक्षा शुल्कात माफी, आवश्यक तेथे पिण्याचे पाणी पुरविण्यासाठी टँकर्सचा वापर व दुष्काळसदृश्य परिस्थिती जाहीर केलेल्या गावात शेतकऱ्यांच्या शेतीच्या पंपाची वीज जोडणी खंडीत न करणे या उपाययोजना करण्यात आल्या आहेत.

(३) व (४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय दिनांक ३१ डिसेंबर, २०१५ अन्वये कृषी विषयक मदत वाटप करण्यासाठी निविष्ठा अनुदानाकरीता एकूण रुपये ३५७८.४३ कोटी निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे, पाणीपुरवठा योजनेकरीता रुपये ३१४.५६ कोटी, जनावरांच्या छावण्यांकरिता रुपये १०९.८४ कोटी निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे. तसेच खरीप २०१५ मधील औरंगाबाद, नाशिक, अमरावती व नागपूर विभागातील कापूस तसेच अमरावती व नागपूर विभागातील सोयाबीन पिकांच्या नुकसानी संदर्भात दिनांक २९ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये रूपये १२९६ कोटी इतकी रक्कम उपलब्ध करून देण्यात आली आहे.

---

## एसी शिवशाही बस सुरू करण्याबाबत

**(८) २०५५१ (१६-०८-२०१६). श्री.आनंदराव पाटील, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर, श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) एसटी महामंडळाने भाडेतत्वावरील एसी शिवशाही बसेसची घोषणा माहे जानेवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान केली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, घोषणा करूनही एसटीच्या ताफ्यात एकही एसी शिवशाही बस दाखल झाली नसल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, एसटी महामंडळाने एसी शिवशाही बस घोषणा करून त्यांची अमंलबजावणी न करण्यामागील कारणे काय आहे, सदरील बससेवा कधी सुरू करण्यात येणार आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (०४-१२-२०१७) :** (१) व (२) होय.

(३) राज्य परिवहन महामंडळाकडून ऑगस्ट, २०१५ मध्ये वातानुकूलित शिवशाही प्रकारातील ५०० बसेससाठी ई-निविदा प्रक्रिया राबविण्यात आली व निविदाकारांना जानेवारी, २०१६ मध्ये सदर बसेस पुरविण्याबाबतचा कार्यादेश देण्यात आला. सदर शिवशाही वातानुकूलित बसेस वेळेत प्राप्त होत नसल्याचे दिसून आल्यामुळे राज्य परिवहन महामंडळाच्या मालकीच्या ५०० वातानुकूलित बसेस घेण्याबाबत महामंडळाच्या संचालक मंडळाद्वारे निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार ५०० वातानुकूलित बसेस घेण्याबाबतची कार्यवाही पुर्ण झाली आहे. उक्त बसेस लवकरच महामंडळाच्या ताफ्यात चालनासाठी उपलब्ध होणार आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## बीड जिल्हयातील चारा छावण्या सुरू ठेवण्याबाबत

**(९) २०५६७ (१९-०८-२०१६). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, श्री.सुनिल तटकरे, श्री.सतिश चव्हाण, श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मराठवाड्यातील बीड जिल्ह्यात दोन महिन्यांचे पैसे शासनाकडे बाकी राहिल्याने छावणी चालकांनी जनावरांसाठी असलेल्या चारा छावण्या बंद करण्याची परवानगी जिल्हाधिकाऱ्यांकडे मागितली असल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मराठवाड्यातील दुष्काळपरिस्थिती लक्षात घेता जनावरांच्या चारा छावण्या बंद करणाऱ्या संबंधित संस्थाना काळ्या यादीत टाकून त्यांच्यावर दंडात्मक कारवाई करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली आहे वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०५-०१-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## रत्नागिरी जिल्हयातील आंबा उत्पादकांना गतवर्षीच्या नुकसान भरपाई देण्याबाबत

**(१०) २०६८२ (१९-०८-२०१६). श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर : तारांकित प्रश्न क्रमांक १२६०२ ला दिनांक १८ डिसेंबर, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रत्नागिरी जिल्हयातील आंबा उत्पादकांना गतवर्षीची आंबा नुकसान भरपाई एक वर्ष होऊन गेले तरी मिळत नसल्याने शेतकरी हैराण झाले असल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले हे खरे आहे काय,

(२) असल्यास,राजापूर तालुक्यातील आंबा आणि काजू नुकसान भरपाईकरीता प्राप्त झालेल्या १२ कोटी अनुदानापैकी निम्म्यापैकी जास्त म्हणजे अंदाजे ६ कोटी, ४ लाख, ७१ हजार ८४३ रुपये शासनाच्या तिजोरीत परत गेले असल्याचे माहे, मे २०१६ मध्ये वा त्या दरम्यान निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, शासनाकडून ३१ मार्च अखेर पर्यत आंबा व काजू नुकसान भरपाईच्या अनुदानाचे वाटप पुर्ण करणे, या नुकसान भरपाईचे वाटप अधिक जलद गतीने व्हावे व सामाईक खातेदारांना बंधपत्राद्वारे नुकसान भरपाई देण्यात यावी असेही शासनाने आदेश दिलेले असतानाही वाटप संथगतीने करण्यात आल्याने निम्मे अनुदान परत गेल्याने ही रक्कम शासनाच्या तिजोरीत पडून असल्याने आंबा व काजू बागायतदारांचे नुकसान झाले आहे, याबाबत शासन आवश्यक कार्यवाही करणार वा करीत आहे काय,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (११-०१-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) व (३) रत्नागिरी जिल्ह्यातील दिनांक ०७/०४/२०१५ च्या संयुक्त पहाणी अहवलानुसार ६४८७४ खातेदारांना शासनाकडून रक्कम रुपये ७९,५३,७५,०००/- इतके अनुदान प्राप्त झाले होते. पैकी रक्कम रुपये ५५,४३,१२,०७८/- एवढ्या निधीचे वाटप करण्यात आलेले आहे.

राजापूर तालुक्याकरिता मुळ यादीतील बाधित क्षेत्र ६९२३ हे आर करीता रक्कम रुपये १२,१५,१०,५००/- एवढे अनुदान प्राप्त झालेले होते. त्यापैकी दिनांक ३१/०३/२०१६ अखरेपर्यंत रुपये ५,९५,२८,१५२/- एवढ्या अनुदानाचे वाटप करण्यात आलेले असून उर्वरित अखर्चित अनुदान हे सहहिस्सेदारांचे बँक खाते क्रमांक उपलब्ध नाहीत/ सामाईक खातेदार/ त्यामधील हिस्सेदार बाहेरगावी असणे/ मयत खातेदार/ हरकती इत्यादी करणांस्तव वितरीत करता आलेले नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मौजे तळेगाव दिघे (ता.संगमनेर, जि.अहमदनगर) येथील उपसरपंचाने शाळेच्या जागेत अतिक्रमण केल्याबाबत**

**(११) २०८४० (११-०८-२०१६). श्री.सुनिल तटकरे, श्री.ख्वाजा बेग, श्री.रामराव वडकुते, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.प्रकाश गजभिये, श्री.नरेंद्र पाटील, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे तळेगाव दिघे (ता.संगमनेर, जि.अहमदनगर) येथील उपसरपंचाने शाळेच्या जागेत अतिक्रमण करुन बांधकाम केल्याचे माहे एप्रिल, २०१६ च्या शेवटच्या सप्ताहात निदर्शनास आले, हे खरे ओह काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यानुषंगाने उपसरपंचाने अतिक्रमित केलेले बांधकाम निष्काषित करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०८-०१-२०१८) :** (१) नाही. हे खरे नाही.

(२) मौजे तळेगाव दिघे (ता.संगमनेर, जि.अहमदनगर) येथील शाळेच्या जागेत उपसरपंचाने अतिक्रमण केलेले नसून, त्यांची बहीण श्रीमती मंगल दत्तात्रय शिंदे यांनी अतिक्रमण केल्याचे दिसून आले आहे. ते निष्काषित करणेची कार्यवाही ग्रामपंचायती मार्फत चालू आहे.

(३) प्रश्नच उद्‌भवत नाही.

---

**नंदुरबार शासकीय वैद्यकीय महाविद्यालय सुरु करण्याबाबत**

**(१२) २१७३१ (२३-०८-२०१६). श्री.चंद्रकांत रघुवंशी :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नंदुरबार शासकीय वैद्यकीय महाविद्यालय गेल्या ४ वर्षापूर्वी मंजूर असूनही आजपर्यंत प्रत्यक्ष कामाला सुरूवात झाली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या कामाला कधी सुरूवात करण्यात येणार आहे,

(३) असल्यास, यासाठी निधीची तरतूद करण्यात आली आहे काय,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१८-१२-२०१७) :** (१) हे खरे आहे.

(२) भारतीय आयुर्विज्ञान परिषद, नवी दिल्ली यांच्या तपासणी समितीमार्फत करण्यात आलेल्या निरीक्षणादरम्यान दर्शविण्यात आलेल्या त्रुटींची पूर्तता केल्यानंतर व एम.सी.आय.ने मान्यता दिल्यानंतर सदरहू महाविद्यालय प्रत्यक्षात सुरु करण्यात येईल. नंदुरबार शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित रुग्णालयांतर्गत विविध इमारतीच्या बांधकामाच्या प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावावर शासनस्तरावर कार्यवाही सुरु आहे.

(३) होय, परंतु सदरचे महाविद्यालय प्रत्यक्षात सुरु न झाल्याने सदरचा निधी वापरता आला नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यातील बदलते हवामान सतत पडणारा दुष्काळ, पावसाचे बदलत चाललेले वेळापत्रक आणि पाण्याची भीषण टंचाई यावर उपाययोजना करण्याबाबत**

**(१३) २१९९२ (१९-०८-२०१६). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील बदलते हवामान, सतत पडणारा दुष्काळ, पावसाचे बदलत चाललेले वेळापत्रक आणि पाण्याची भीषण टंचाई यावर उपाययोजना करण्यासाठी शासनाला दुष्काळी उपाययोजना यशस्वी अंमलबजावणीसाठी स्वतंत्र खाते निर्माण करण्याची मागणी होत असल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील दुष्काळीभागात दुष्काळी उपाययोजना यशस्वी अंमलबजावणी करण्यासाठी स्वतंत्र खाते निर्माण करण्याबाबत शासनाने आपली भुमिका स्पष्ट करुन त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०५-०१-२०१८) :** (१), २) व ३) स्वतंत्र खाते तयार करण्याचा प्रस्ताव सध्या तरी विचाराधीन नाही.

---

## काटोल उपआगाराच्या (नागपूर-अमरावती मार्गवरील) कोंढाळी बसस्थानकाचे काम निकृष्ट दर्जाचे असल्याबाबत

**(१४) २२२८६ (१६-०८-२०१६). प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर-अमरावती राष्ट्रीय महामार्ग क्रमांक ६ वरील काटोल उपआगाराच्या कोंढाळी बस स्थानकाचे नव्याने करण्यात आलेले बांधकाम निकृष्ट दर्जाचे असल्याने भितींना उद्‌घाटनापूर्वी तडे गेल्याचे दिनांक २४ मे, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली काय, चौकशीत काय आढळून आले व तद्‌नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे कोणती आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (११-०१-२०१८) :** (१) व (२) काटोल उपआगाराच्या कोंढाळी बसस्थानकाचे नव्याने करण्यात आलेल्या बसस्थानकाच्या बांधकामास तडा गेला नसून, प्रसाधनगृहाच्या समोरील भिंतीला तडा गेलेला असून सदरची दुरुस्ती करण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुद्रांक शुल्क न भरणाऱ्यांवर कारवाई करण्याबाबत

**(१५) २२३३७ (१६-०८-२०१६). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील चित्रपट बनविणाऱ्या अनेक कंपन्यांची कार्यालये असून चित्रपटांमध्ये काम करणारे अभिनेत्री व इतर कलावंत यांना कंपन्या कोट्यवधी रुपये देत असून याचे करारही करीत असतात, याची नोंदणी व मुद्रांक शुल्क भरणे बंधनकारक असतानाही त्याची नोंदणी, नोंदणी व मुद्रांक विभागाकडे केली जात नसल्याचे दिनांक १८ मे, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यामुळे शासनाचा कोट्यावधी रुपयांचा महसूल बुडत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार सदरील महसूल मिळविण्याबाबत तसेच मुद्रांक शुल्क न भरणाऱ्या संबंधितांवर कारवाई करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (११-०१-२०१८) :** (१), (२) व (३) नोंदणी अधिनियम १९०८ च्या कलम १८ मधील तरतूदीनुसार चित्रपट कलाकारांनी निर्मात्यांबरोबर केलेल्या कराराची नोंदणी सक्तीची नाही मात्र अशा करारांवर विहित दराने मुद्रांक भरणे क्रमप्राप्त आहे.

शासनाने मुद्रांक व नोंदणी विभागामध्ये चुकविलेल्या मुद्रांकाचा शोध व वसुली करणे याकरिता बृहन्मुंबई मध्ये मुद्रांक जिल्हाधिकारी, अंमलबजावणी-१ व अंमलबजावणी-२ अशी दोन पदे निर्माण केली असून या दोन अधिकाऱ्यांच्या पथकाकडून विविध संस्था, कंपन्या, शासकीय, निमशासकीय कार्यालये, सोसायटया यांचेकडे होणाऱ्या दस्तऐवजामध्ये मुद्रांक शुल्क बुडविले आहे किंवा कसे याचा शोध घेण्याचे काम सुरु आहे. या कार्यवाही अंतर्गत मुद्रांक जिल्हाधिकारी अंमलबजावणी-१ व अंमलबजावणी-२ या कार्यालयांतर्फे दस्तऐवज व इतर कागदपत्रे सादर करण्याकरिता संबंधितांना नोटीसा बजावण्यात येतात आणि मुद्रांक शुल्क चुकविलेले आढळून आल्यास त्याची वसुलीची कार्यवाही नियमानुसार करण्यात येते. याप्रमाणे कार्यवाही करीत असताना चित्रपटसृष्टीमधील संबंधित कंपन्यांना नोटीसा पाठवून करारपत्राच्या प्रती सादर करण्यास कळविण्यात आले आहे. त्यानुषंगाने प्राप्त दस्तांची पडताळणी करुन मुद्रांक शुल्क कमी भरल्याचे आढळल्यास नियमानुसार वसुलीची कार्यवाही करण्याची तजवीज ठेवलेली आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे जिल्हयातील ग्रामपंचायतींमध्ये गैरव्यवहार झाल्याबाबत

**(१६) २२३८४ (१९-०८-२०१६). श्री.रामहरी रुपनवर, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे जिल्हयातील अनेक ग्रामपंचायतीमध्ये आर्थिक गैरव्यवहार, दप्तर सुस्थितीत न ठेवणे, गहाळ करणे आदी प्रकार स्थानिक निधी लेखापरिक्षणात निदर्शनास आल्यानंतर देखील ग्रामपंचायतींवर कोणतीच कारवाई होत नसल्याचे माहे एप्रिल, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, ग्रामपंचायतींना विशेषाधिकार मिळत असताना व शासनाचा कारभार पारदर्शक असताना गैरव्यवहार करणाऱ्या संबंधित अधिकाऱ्यांवर शासनाने चौकशी करुन कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (११-१२-२०१७) :** (१) हे अंशत: खरे आहे.

(२) i) पुणे जिल्हयात एकूण १४०७ ग्रामपंचायती असून स्थानिक निधी लेखापरीक्षक पुणे यांच्याकडून २०१५-१६ मध्ये ग्रामनिधी अपहाराची साल (ता.आंबेगांव), लाटे (ता.बारामती), यवत (ता.दौंड) या ग्रामपंचायतींची प्रकरणे प्राप्त झाली असून साल ग्रामपंचायतीचे ग्रामसेवक यांना निलंबित करून फौजदारी गुन्हा दाखल केला आहे. लाटे ग्रामपंचायतींच्या ग्रामसेवकावर प्रशासकीय कारवाई सुरु आहे. यवत ग्रामपंचायतीच्या ग्रामसेवकावर गुन्हा दाखल केला असून त्यांच्यावर सद्या कोर्ट केस सुरू आहे.

ii) सन २०१६-१७ मध्ये स्थानिक निधी लेखापरीक्षक पुणे यांच्याकडून संशयित ग्रामनिधी अपहाराची एकूण १४ नवी प्रकरणे प्राप्त झाली असून संबंधित गटविकास अधिकारी यांना कारवाई करण्याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांनी पत्र दिले असून पंचायत समिती स्तरावरून कार्यवाही सुरू आहे.

iii) सन २०१६-२०१७ मध्ये स्थानिक निधी लेखापरीक्षक पुणे यांच्याकडून दप्तर उपलब्ध न झालेली एकूण १९ प्रकरणे प्राप्त झालेली असून त्याबाबत केलेल्या चौकशीनुसार ९ ग्रामपंचायतींचे अभिलेखे उपलब्ध आहेत. त्यापैकी ३ ग्रामपंचायतींच्या अभिलेख्यांचे लेखापरीक्षण पूर्ण झालेले आहे.

४ ग्रामपंचायतींचे लेखापरीक्षण करण्याबाबत स्थानिक निधी लेखा, पुणे यांना कळविणेत आले आहे. एका ग्रामपंचायतींचे दप्तर पोलीस स्टेशनमध्ये जमा केलेले आहे व एका ग्रामपंचायतींचे दप्तर न्यायालयामध्ये जमा केलेले आहे.

उर्वरित १० ग्रामपंचायतींपैकी ६ ग्रामपंचायतींकडे दप्तर उपलब्ध नाही. यापैकी ४ ग्रामपंचायतीच्या ग्रामसेवकांवर खातेनिहाय चौकशी प्रस्तावित केली आहे. एका ग्रामपंचायतीचे संबंधित ग्रामसेवक मृत्यू पावले आहेत. एका ग्रामसेवकाना निलंबित केले आहे तसेच ४ ग्रामपंचायतींचे दप्तर महानगरपालिका/नगरपालिकांकडे जमा केलेले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## रायगड जिल्ह्यातील पनवेल एस. टी. स्थानकाची झालेली दुरवस्था

**(१७) २२४३८ (१६-०८-२०१६). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पनवेल (जि.रायगड) येथील एस.टी. स्थानकाची दुरवस्था झाली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर स्थानकांची शासनामार्फत पाहणी केली आहे काय, पाहणीत काय आढळून आले व तद्नुसार सदर एस.टी. बस स्थानकाची दुरुस्ती करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (११-०१-२०१८) :** (१) व (२) राज्य परिवहन महामंडळाच्या पनवेल बसस्थानकाची इमारत जुनी झाली असल्याने ती पाडण्यात आली आहे. त्यामुळे प्रवाशांची गैरसोय होवू नये म्हणून आवारात असलेल्या आगार इमारतीचे बसस्थानकात रुपांतर व दर्जावाढ करुन फलाट उपलब्ध करण्यात आले आहेत. सदर बसस्थानक शेडमध्ये प्रवाशांना आसन व्यवस्था, प्रसाधनगृह, पाणी, लाईट, पंखे, तिकिट आरक्षण व्यवस्था, वाहनतळाचे कॉंक्रिटीकरण इ. सुविधा करण्यात आल्या आहेत.

पनवेल येथे अद्ययावत बसस्थानकाची गरज लक्षात घेवून आधुनिक बसतळ (बसपोर्ट) उभारणेच्या कामांमध्ये पनवेलचा समावेश करण्यात आला आहे. या प्रकल्पाची सार्वजनिक-खाजगी सहभागातून (पीपीपी) आखणी व व्यवस्थापनासाठी तज्ज्ञ सल्लागार संस्थेची नेमणूक करण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**मौजे किन्ही (ता.पारनेर, जि.अहमदनगर) येथील सरपंच व उपसरपंच यांच्या चौकशीबाबत**

**(१८) २२५३८ (११-०८-२०१६). श्री.अरुणकाका जगताप :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे किन्ही (ता.पारनेर, जि.अहमदनगर) येथील सरपंच व उपसरपंच यांची सुरु असलेली चौकशी पूर्ण झाली आहे काय,
(२) असल्यास, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार सदर सरपंच व उपसरपंच यांचेवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०८-०१-२०१८) :** (१) होय.
(२) प्रस्तुत प्रकरणी मौजे किन्ही-बहिरोबावडी ग्रामपंचायतीमध्ये मग्रारोहयोमध्ये झालेल्या भ्रष्टाचाराच्या अनुषंगाने करण्यात आलेल्या चौकशीमध्ये सरपंच, उपसरपंच दोषी नसून, ग्रामसेवक दोषी असल्याने, त्यांचेवर महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ चे कलम १७९ खालील कारवाई प्रस्तावित आहे. तसेच पारनेर पोलीस स्टेशन येथे तत्कालीन ग्रामसेवकाविरुध्द गुन्हा दाखल करण्यात आला आहे.
(३) लागू नाही.

---

**सोलापूर-पंढरपूर मार्गावरील राज्य परिवहन महामंडळाच्या बसेसमधुन प्रवास करणाऱ्या प्रवाश्यांची होणारी लूट थांबविण्याबाबत**

**(१९) २५५४३ (३०-१२-२०१६). श्री.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त, श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सोलापूर-पंढरपूर मार्गावर राज्य परिवहन महामंडळाच्या बसमधुन प्रवाश्यांची बेकायदेशीर लूट करीत असल्याच्या तक्रारी प्रवासी संघटनांनी परिवहन महामंडळाकडे करूनही परिवहन महामंडळ कोणतीही दखल घेत नसल्याचे माहे ऑगस्ट, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार प्रवाशांची होणारी लूट थांबविण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (११-०१-२०१८) :** (१) नाही.

(२) सदर प्रकरणी महामंडळाने चौकशी केली असून प्रवासामध्ये प्रवाशांकडून कोणतेही अतिरिक्त भाडे घेऊन प्रवाशांची लूट केली जात नसल्याचे आढळून आले.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**शिक्षक-शिक्षकेतर कर्मचाऱ्यांनी खाजगी विनाअनुदानित शाळेत केलेली सेवा वरिष्ठ निवडश्रेणी तसेच कालबध्द पदोन्नतीसाठी ग्राहय धरण्याबाबत**

**(२०) २५७७० (०४-०१-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक २०२८५ ला दिनांक २० जुलै, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शिक्षक-शिक्षकेतर कर्मचाऱ्यांनी खाजगी विनाअनुदानित शाळेत केलेली सेवा वरिष्ठ निवडश्रेणी तसेच कालबध्द पदोन्नतीसाठी ग्राहय धरण्याबाबतच्या विचाराधीन असलेल्या प्रस्तावावर शासनाचा विचार पुर्ण झाला आहे काय,

(२) असल्यास, यानुषंगाने कोणता निर्णय घेण्यात आला आहे व त्यानुसार काय कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,
(३) नसल्यास, सदरील कार्यवाही केव्हापर्यंत पुर्ण होणे अपेक्षित आहे ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (१८-०१-२०१८) :** (१) नाही.
(२) शिक्षक-शिक्षकेतर कर्मचाऱ्यांनी खाजगी विनाअनुदानित शाळेत केलेली सेवा वरिष्ठ निवडश्रेणी तसेच कालबध्द पदोन्नतीसाठी ग्राह्य धरण्याबाबतचा प्रस्ताव अद्यापि शासनाच्या विचाराधीन आहे
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नांदेड जिल्हा परिषदेने पाणी शुध्दीकरणासाठी टीसीएल पावडर ग्रामपंचायतीने खरेदी करावी असा नियम केल्याबाबत

**(२१) २५८५१ (१६-१२-२०१६). श्री.सुभाष झांबड, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नांदेड जिल्हा परिषदेच्या ग्रामीण पाणीपुरवठा विभागाकडून पूर्वी पाणी शुध्दीकरणासाठी आवश्यक पावडर ग्रामपंचायतींना उपलब्ध करुन दिली जात असे परंतु सदर पावडर पुरवठा करण्याचे काम जिल्हा परिषदेने बंद करुन त्या त्या ग्रामपंचायतीने टीसीएल पावडर खरेदी करावी असा नियम घालून दिला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, जिल्ह्यातील १५१ ग्रामपंचायतीमध्ये टीसीएल पावडरचा साठा उपलब्ध नसल्याचा अहवाल जिल्हा आरोग्य अधिकारी यांना माहे जानेवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान प्राप्त झाला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, या प्रकरणी शासनाने चौकशी करुन ग्रामीण जनतेच्या आरोग्याशी निगडीत टीसीएल साठा उपलब्ध न ठेवणाऱ्या ग्रामपंचायतीवर आणि संबंधित ग्रामसेवकांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०८-०१-२०१८) :** (१) होय. हे खरे आहे.
(२) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड यांच्या अहवालानुसार माहे जानेवारी, २०१६ अखेर जिल्हयात १३५ ग्रामपंचायतीमध्ये ब्लिचिंग पावडर उपलब्ध नव्हती.
(३) संबधित ग्रामपंचायतीना टीसीएल पावडर उपलब्ध करुन घेण्याबाबत ग्रामसेवकाच्या मासिक आढावा बैठकीत सूचना दिल्या आहेत. सद्य:स्थितीत १३५ ग्राम पंचायतीपैकी ३० ग्रामपंचायतीमध्ये जलशुध्दीकरण सयंत्र बसविण्यात आली असून उर्वरित १०५ ग्रामपंचायतीमध्ये ब्लिचींग पावडर उपलब्ध असल्याबाबत खात्री करण्यात आलेली आहे. संबंधितांनी पावडर उपलब्ध करुन घेऊन वापर केल्याबाबतची खात्री करुन घेण्यात आली आहे. त्यामुळे संबंधित ग्रामसेवकांवर कारवाई करण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही.
(४) प्रश्नच उद्‌भवत नाही.

---

**किन्ही, बायफळ व बिबखेड (ता.लोणार, जि.बुलढाणा) या किनगावजट्ट मार्गावर परिवहन महामंडळ किंवा शिक्षण विभागाची मानव विकास योजनेची बसफेरी चालू करण्याबाबत**

**(२२) २६४२८ (३०-१२-२०१६). श्री.सुभाष झांबड, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) किन्ही, बायफळ व बिबखेड (ता.लोणार, जि.बुलढाणा) या किनगावजट्ट मार्गावरील तिन्ही गावातील सुमारे १०० ते १५० मुली लोणार येथे शिक्षणासाठी येत असून किनगावजट्टकडून सकाळी येणारी बसफेरी ही प्रवाशांनी भरुन येत असल्याने उक्त बस तिन्ही ठिकाणी न थांबता निघुन जात असल्यामुळे मुलींना शाळेत वेळेवर पोहचणे शक्य होत नसल्याने त्यांचे शैक्षणिक नुकसान होत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, येथील विद्यार्थ्यांनीनी बसेस अडवून आंदोलनही केले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार विद्यार्थ्यांची गैरसोय होऊ नये म्हणून परिवहन महामंडळ किंवा शिक्षण विभागाची मानव विकास योजनेची बसफेरी चालू करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (११-०१-२०१८) :** (१), (२) व (३) किन्ही, वायफळ व बिबखेड येथून अहिल्याबाई योजनेंतर्गत एकूण ४५ पासधारी विद्यार्थीनी तसेच वायफळ व बिबखेड येथून १५ शालेय पासधारी विद्यार्थिंनी अशा एकूण ६० मुली दररोज लोणार येथे शिक्षणासाठी येत आहेत.

किन्ही, वायफळ व बिबखेड येथून विद्यार्थी/प्रवासी यांच्या सोयीकरीता दैनंदिन १४ फेऱ्या उपलब्ध आहेत. तसेच, दिनांक २३/०९/२०१६ पासून लोणार-किन्ही या मार्गावर नव्याने २ फेऱ्या सुरु करण्यात आलेल्या आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यातील कृषि विभागातील रिक्त पदे भरण्याबाबत**

**(२३) २६८१० (१३-०४-२०१७). डॉ.अपूर्व हिरे, श्री.सतिश चव्हाण, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.परिणय फुके, श्री.जयवंतराव जाधव, श्री.हेमंत टकले, ॲड.निरंजन डावखरे : तारांकित प्रश्न क्रमांक २५१९५ ला दिनांक ८ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील कृषि विभागांतर्गत अ, ब, क व ड संवर्गातील कर्मचाऱ्यांची एकूण २७५०२ मंजुर पदांपैकी ७३३० पदे रिक्त असल्याने सदर पदांचा अतिरिक्त पदभार नजिकच्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना देवून कामकाज पार पाडण्यात येत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, गट-क मधील विविध संवर्गातील रिक्त पदे शासनाच्या प्रचलित धोरणानुसार भरण्याची कार्यवाही करण्याबाबत आयुक्त, कृषि यांना कळविण्यात आलेले आहे, तसेच गट ब (कनिष्ठ) मधील ५० पदांच्या भरतीसाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे कार्यवाही चालु आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, कृषि विभागातील विविध संवर्गातील पदे रिक्त असल्याने

शेतकऱ्यांना कृषि विषयक अडचणींचा मोठ्या प्रमाणात सामना करावा लागत असल्यामुळे कृषि विभागातील रिक्त पदे भरण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.पांडुरंग फुंडकर (०९-०१-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

कृषि विभागामध्ये माहे जून, २०१७ अखेर एकुण २७५०२ मंजूर पदांपैकी १९३९४ पदे भरलेली असून ८१०८ पदे रिक्त आहेत.

(२) होय.

गट-क मधील रिक्त पदे भरणेबाबत शासन पत्र दिनांक २८/१०/२०१६ अन्वये आयुक्त (कृषि) यांना कळविण्यात आले असून त्यानुसार लिपिक वर्गीय पदे नियमातील तरतुदीनुसार जाहिरात विज्ञापित करुन त्रयस्थ यंत्रणेमार्फत भरणेबाबत सर्व विभागीय कृषि सहसंचालक यांना दिनांक ०८/१२/२०१६ रोजीचे पत्रान्वये कळविण्यात आलेले आहे.

महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब (कनिष्ठ) संवर्गातील सरळसेवेच्या कोटयातील रिक्त पदांपैकी ५० पदांकरीता लोकसेवा आयोगास पाठविलेल्या मागणीपत्रानुसार ५० पदांची निवड यादी आयोगाकडून शासनास प्राप्त झालेली आहे. सदर उमेदवारांना नियुक्ती देण्याच्या अनुषंगाने त्यांची शैक्षणिक अर्हता प्रमाणपत्र तपासणी व इतर अनुषंगिक तपासण्या करण्यात येत आहेत.

(३) कृषि संचालक, गट-अ संवर्गातील ४ रिक्त पदे दिनांक ०५/०६/२०१७ च्या आदेशान्वये भरण्यात आलेली आहेत. कृषि सहसंचालक, गट-अ संवर्गात रिक्त असलेली ९ पदे भरण्याची कार्यवाही अंतिम टप्प्यावर आहे.

महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) संवर्गातील सरळसेवेच्या कोटयातील ५० उमेदवारांची निवडयादी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून प्राप्त झालेली असून त्यांना नियुक्ती देण्याची कार्यवाही सुरु आहे. तसेच आणखी ७९ रिक्त पदांचे मागणीपत्र दिनांक ३०/०३/२०१७ रोजीच्या शासन पत्रान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगास पाठविण्यात आले आहे.

तसेच या संवर्गातील पदोन्नतीच्या कोटयातील १०२ रिक्त पदे पदोन्नतीने भरण्याची कार्यवाही अंतिम टप्प्यावर आहे.

क्षेत्रिय स्तरावरील कृषि सहाय्यक संवर्गाची पदे भरण्यासाठी ७३० पदे

विज्ञापित करण्यात आली होती. तथापि, सदर पदासाठीची निवड यादी रद्द करण्यात आली आहे. यामुळे सदर पदे भारांकन पध्दतीने भरण्याबाबत शासन निर्णय, दिनांक १७/०३/२०१७ नुसार कार्यवाही कार्यान्वित होती. तथापि, सध्या प्रकरण न्यायप्रविष्ठ असल्याने ती भरता आलेली नाहीत. शासन निर्णय दिनांक ०२/०६/२०१५ व दिनांक १५/०१/२०१६ नुसार या संवर्गातील आदिवासी क्षेत्रातील व क्षेत्राबाहेरील रिक्त पदे भरण्याबाबतही विभागीय कृषि सहसंचालक यांना दिनांक १२/०७/२०१७ रोजीचे पत्रान्वये निर्देश देण्यात आलेले आहेत.

गट-क मधील रिक्त पदे भरणेबाबत शासन पत्र दिनांक २८/१०/२०१६ मधील निदेशानुसार लिपिक वर्गीय पदे नियमातील तरतुदीनुसार जाहिरात विज्ञापित करुन त्रयस्थ यंत्रणेमार्फत भरणेबाबत सर्व विभागीय कृषि सहसंचालक यांना दिनांक ०८/१२/२०१६ रोजीचे पत्रान्वये कळविण्यात आलेले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबई शहर रस्ते वाहतूक व गाड्या पार्कींग समस्या सोडविण्याबाबत

**(२४) २७८६८ (१३-०४-२०१७). श्री.धनंजय मुंडे, श्री.जयवंतराव जाधव, श्री.हेमंत टकले, श्री.अमरसिंह पंडित, श्री.सतिश चव्हाण, ॲड.निरंजन डावखरे : तारांकित प्रश्न क्रमांक २४७९३ ला दिनांक ८ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या जनहित याचिका क्र.१००/२०१५ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दिनांक ८ फेब्रुवारी, २०१६ रोजी उड्डाणपुलाखालील पार्किंग हटविण्याचे अंतरिम आदेश दिले असून अंतरिम आदेशानुसार उड्डाणपुलाखालील पार्कींग पूर्णपणे हटविण्यात आली आहे काय,

(२) असल्यास, सदर कारवाईची सद्य:स्थिती काय आहे,

(३) असल्यास, मा.उच्च न्यायालयाच्या निर्देशानुसार सर्व संबंधित विभागानी परस्पर सहकार्याने धोरणात्मक निर्णय घेण्यात आले आहे काय, सदर निर्णयाचे स्वरुप काय आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०३-०१-२०१८) :** (१) ते (४) मा.उच्च न्यायालयाच्या जनहित याचिका क्र. १००/२०१५ संदर्भातील दिनांक ०८/०२/२०१६ च्या निर्णयानुसार, उड्डाणपुलाखालील अनधिकृत पार्किंग हटविण्याबाबत महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडून आवश्यक कार्यवाही करण्यात येत आहे. महामंडळाच्या २१ उड्डाणपुलांपैकी ५ उड्डाणपुलांखाली सद्य:स्थितीत अनधिकृत पार्किंग सुरू असून, त्याविरूद्ध संबंधित स्थानिक पोलीस स्थानकांमध्ये गुन्हे नोंदविण्यात आले आहेत. यापैकी एका प्रकरणी आरोपीला अटक करण्यात आली आहे.

सद्य:स्थितीत, उड्डाणपुलाखालील पार्किंग बाबत मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दोन जनहित याचिका दाखल असून, जनहित याचिका क्र.१००/२०१५ च्या अंतरिम आदेशान्वये उड्डाणपुलाखालील पार्किंग बंद करणेबाबत आदेशित केलेले आहे. तसेच जनहित याचिका क्र.१८/२०१४ च्या अंतरिम आदेशान्वये उड्डाणपुलाखालील पार्किंगच्या अनुषंगाने शासनाने धोरणात्मक निर्णय घेऊन सर्व संबंधित विभागांना त्याबाबत समन्वय साधण्याचे आदेश मा.उच्च न्यायालयाने दिलेले आहेत. याबाबतची कार्यवाही प्रगतीत आहे.

---

## कोळोणा (चोरे) ते रायपूर (जि.वर्धा) रस्त्यांची दूरवस्था झाल्याबाबत

**(२५) २८०४२ (१७-०४-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कोळोणा (चोरे) ते रायपूर (जि.वर्धा) रस्त्यांची दूरवस्था झाल्यामुळे स्थानिकांचे हाल होत असल्याने त्यांनी रस्ता दुरुस्तीसाठी संबंधितांना माहे जून, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान लेखी निवेदने दिली आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सहा महिन्यांचा कालावधी उलटूनही अद्यापपर्यंत या रस्त्याची दुरुस्ती न झाल्याने शेतकऱ्यांना त्यांच्या शेतात जाण्याकरिता मोठा वळसा मारावा लागत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, पाटबंधारे विभागाने योग्य उपाययोजना न केल्याने बंधाऱ्यातील पाणी रस्त्यावर वाहून रस्त्याची दूरवस्था झालेली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन रस्ता दुरुस्त करणे व संबंधित दोषींवर कारवाई करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०५-०१-२०१८) :** (१) व (२) जिल्हा परिषदेकडे अशा प्रकारचे निवेदन प्राप्त झाल्याचे आढळून येत नाही. तथापि या रस्त्याची दुरुस्ती करणे आवश्यक आहे.
(३) रस्त्याचा भाग हा खोलगट असल्याने पावसाळ्यात पावसाचे तसेच शेतातील पाणी रस्त्यावर साचत असल्याने तेथे चिखल होवून रस्ता खराब होतो.
(४) कोळोणा (चोरे) व रायपुर ही दोन्ही गावे डांबरी रस्त्यांनी जोडलेली आहेत. कोळोणा ते रायपूर ग्रामीण मार्ग क्र. ६४ या रस्त्यावर दोन्ही गावाच्या लोकांची शेती आहे. सदर रस्ता हा पूर्वी पांधन रस्ता होता. आता सदर रस्ता दर्जोन्नत होवून ग्रामीण मार्ग क्र.६४ झालेला आहे. या रस्त्याची एकूण लांबी ३.५० कि.मी. आहे. या रस्त्याचे नवीन बांधकाम, मजबुतीकरण व डांबरीकरण करणे आवश्यक आहे. जिल्हा परिषदेला विविध योजनांमधून प्राप्त निधी व निकषाच्या अधिन राहून सदर रस्त्याचे काम टप्प्या-टप्प्याने प्रस्तावित करण्याचा जिल्हा परिषदेचा प्रयत्न आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**मे.उषा पेपर प्राडक्टस लि. यांच्या मालकीचे क्षेत्र अतिरिक्त घोषित केल्याबाबत**

**(२६) २८२७० (१३-०४-२०१७). ॲड.अनिल परब :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे-कल्याण येथील जमीनधारक मे.उषा पेपर प्राडक्टस लि. यांच्या मालकीच्या (ता.कल्याण, जि.ठाणे) स.क्र. ४३/३, ६६/१, ६६/६, ६८, ६९, ७३/१, ७३/२, ७४, ७५, ७६ आणि ७८/१ मधील १,१०,१८१.३४ चौ.मी क्षेत्राबाबत तत्कालिन सक्षम प्राधिकारी यांनी दिनांक २३ ऑक्टोबर, १९८० रोजी कलम ८(४) चे आदेश पारित करुन ९५,४७१.२८ चौ.मी क्षेत्र अतिरिक्त घोषित करण्यात आल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त क्षेत्र महानगरपालिकेच्या भागशः मंजूर विकास योजनेनूसार ३०.०० मी, २४.०० मी., १८.०० मी व १५.०० मी. रुंद रस्ता तसेच विविध आरक्षणाने बाधित होत असून उर्वरित क्षेत्र रहिवास विभागामध्ये समाविष्ट होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त आरक्षणामधील आ.क्र.४५ " दुकान केंद्र", आ.क्र. ४६ "वाचनालय", आ.क्र. ४८ "महिला कल्याण केंद्र" या व्यतिरिक्त उर्वरित आ.क्र.४० "सफाई कामगार वसाहत", आ.क्र. ४७ "प्राथमिक शाळा", आ.क्र. ४९ "म्हाडा", आ.क्र.४४ "मनोरंजनाचे मैदान", आ.क्र.५० "पोलीस आयुक्तालय", आ.क्र.५१ "महाराष्ट्र राज्य परिवहन मार्ग मंडळ", आ.क्र.५४ "दुरध्वनी खाते", आ.क्र. ५५ "न्यायालय इमारत" या आरक्षणाखालील बाधित क्षेत्र असतांना संबंधित कार्यालयाना महानगरपालिकेने अवगत करणे बंधनकारक असतांनाही कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेने सदरहू आरक्षित भूखडांचे एम.आर.टी.पी ॲक्टच्या अधिन भूमी अधिग्रहण करुन भूखंडाचा ताबा संबंधित शासकीय कार्यालयाना दिलेला नाही तसेच महानगरपालिकेची स्वतःची असलेली आरक्षणेदेखील अदयाप ताब्यात घेतलेली नसल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर प्रकरणी मा.मुख्यमंत्री महोदयांनी सन २०१६ च्या पावसाळी अधिवेशनात यासंदर्भात मा.राज्यमंत्री महोदयाना तात्काळ बैठक घेऊन पुढील कार्यवाही करण्याचे आदेश देऊनही कोणतीच कार्यवाही झालेली नसून उक्त प्रकरणी शासनस्तरावर चौकशी करण्यात आली आहे काय, त्यात काय आढळून आले, तद्नुसार दोषी व्यक्तीवर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०८-०१-२०१८) :** (१) होय.

(२) होय.

(३) व (४) आरक्षण क्र. ४७- प्राथमिक शाळा, क्षेत्र २५०० चौ.मी., आरक्षण क्र. ५०- पोलीस आयुक्तालय, क्षेत्र ८९०० चौ.मी., आरक्षण क्र. ४१- महानगरपालिका कर्मचारी वसाहत, क्षेत्र १११४ चौ.मी असे सुमारे १२५१४ चौ.मी. क्षेत्र महानगरपालिकेच्या ताब्यात आले आहे. शासनाच्या दिनांक २०/०९/२००७ व दिनांक ०२/०५/२०१६ च्या शासन निर्णयानूसार शासनाच्यावतीने संबंधित विभागाच्या मागणीनुसार भूसंपादन करुन आरक्षणाने बाधित जागा संबंधित शासकीय विभागाना उपलब्ध करुन देता येते. त्या अनुषंगाने आरक्षण क्र. ५०- पोलीस आयुक्तालय या आरक्षणाने बाधित क्षेत्राचा ताबा महानगरपालिकेने घेतला असून, सदरहू क्षेत्र महानगरपालिकेकडून पोलीस

विभागास हस्तांतरीत करण्याची कार्यवाही सुरु आहे. सदर प्रकरणी विषयांकित जागेसंदर्भात उर्वरीत आवश्यक त्या बांधकामयोग्य सामाजिक सुखसोयी/ आरक्षणे प्राधिकरणास हस्तांतरीत करणेबाबतच्या पुढील कार्यवाही संबंधाने तसेच मा.उच्च न्यायालयात सुरु असलेली याचिका क्र. ७१९८/२००८ याबाबत महानगरपालिकेस विकासकाने अद्यापपर्यंत अवगत न केल्याने व त्याबाबतची स्पष्टता होणे आवश्यक असल्याने जागेवर सुरु असलेल्या बांधकामास सदर मुददयांची पुर्तता होईपर्यंत स्थगित ठेवण्याचे आदेश महानगरपालिकेने विकासकास दिनांक ०४/०३/२०१७ रोजी दिले आहेत.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील शेतकऱ्यांना पीक विम्याची रक्कम मिळण्याबाबत

**(२७) २८५१७ (१३-०४-२०१७). श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील पीक विम्याची भरपाई न मिळालेल्या ३२ हजार गावांमधील ४५ ते ५० लाख शेतकऱ्यांसाठी शासनाने २ हजार कोटी रुपयांचे पॅकेज जाहिर केले असल्याचे माहे डिसेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी चौकशी करून शेतकऱ्यांना पीक विम्याची भरपाई देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०५-०१-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) रब्बी २०१५ मध्ये ५० पैशांपेक्षा कमी पैसेवारी आलेल्या अहमदनगर व सोलापूर जिल्ह्यातील १९९१ गावातील शेतकऱ्यांना ज्यांनी पीक विमा योजना घेतली नाही त्यांना पीक विमा योजना घेतलेल्या शेतकऱ्यांना मंजूर होणाऱ्या मंडळ निहाय भरपाईच्या ५०% प्रमाणे मदत देण्याचा निर्णय महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एससीवाय-२०१६/प्र.क्र.२१९/म-७, दिनांक २९/१२/२०१६ अन्वये घेण्यात आला. त्यानुषंगाने अहमदनगर जिल्ह्यासाठी रूपये १३३ कोटी व सोलापूर जिल्ह्यासाठी ५७.५२ कोटी इतका निधी उपलब्ध करून दिला आहे.

खरीप २०१५ मधील औरंगाबाद, नाशिक, अमरावती व नागपूर विभागातील कापूस व अमरावती व नागपूर विभागातील सोयाबीन उत्पादकांना ज्यांनी पीक विमा योजना घेतलेल्या शेतकऱ्यांना मंजूर होणाऱ्या मंडळ निहाय भरपाईच्या ५०% प्रमाणे मदत देण्याचा निर्णय, महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एससीवाय-२०१६/प्र.क्र.१/म-७, दिनांक २९/१२/२०१६ अन्वये घेण्यात आला. त्यानुषंगाने रूपये १२९६ कोटी इतका निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौदा, रामटेक, पारशिवनी (जि.नागपूर) तालुक्यातील कृषी विभागातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(२८) २९०५१ (१३-०४-२०१७). श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौदा, रामटेक, पारशिवनी (जि.नागपूर) तालुक्यातील कृषी विभागाकडून शेतकऱ्यांना योग्य मार्गदर्शन मिळत नसल्याने शेतकऱ्यांचे उत्पादन कमी आल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कृषी विभागातील अपुऱ्या कर्मचाऱ्यांमुळे शेतकऱ्यांना शेती विषयक मार्गदर्शन देता येत नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कृषी विभागातील रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.पांडुरंग फुंडकर (२१-०८-२०१७) :** (१) नाही.

(२) हे अंशत: खरे आहे.

(३) कृषि संचालक, गट-अ संवर्गातील ४ रिक्त पदे दिनांक ०५/०६/२०१७ च्या आदेशान्वये भरण्यात आलेली आहेत. कृषि सहसंचालक, गट-अ संवर्गात रिक्त असलेली ९ पदे भरण्याची कार्यवाही अंतिम टप्प्यावर आहे.

महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) संवर्गातील सरळसेवेच्या कोटयातील ५० उमेदवारांची निवड यादी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून प्राप्त झालेली असून त्यांना नियुक्ती देण्याची कार्यवाही सुरु आहे. तसेच आणखी ७९ रिक्त पदांचे मागणीपत्र दिनांक ३०/०३/२०१७ रोजीच्या शासन पत्रान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगास पाठविण्यात आले आहे.

तसेच या संवर्गातील पदोन्नतीच्या कोटयातील १०२ रिक्त पदे पदोन्नतीने भरण्याची कार्यवाही अंतिम टप्प्यावर आहे.

क्षेत्रिय स्तरावरील कृषि सहाय्यक संवर्गाची पदे भरण्यासाठी ७३० पदे विज्ञापित करण्यात आली होती. तथापि सदर पदासाठीची निवड यादी रद्द करण्यात आली आहे. यामुळे सदर पदे भारांकन पध्दतीने भरण्याबाबत शासन निर्णय, दिनांक १७/०३/२०१७ नुसार कार्यवाही कार्यान्वित होती. तथापि, सध्या प्रकरण न्यायप्रविष्ठ असल्याने ती भरता आलेली नाहीत. शासन निर्णय दिनांक ०२/०६/२०१५ व दिनांक १५/०१/२०१६ नुसार या संवर्गातील आदिवासी क्षेत्रातील व क्षेत्राबाहेरील रिक्त पदे भरण्याबाबतही विभागीय कृषि सहसंचालक यांना दिनांक १२/०७/२०१७ रोजीचे पत्रान्वये निर्देश देण्यात आलेले आहेत.

गट-क मधील रिक्त पदे भरणेबाबत शासन पत्र दिनांक २८/१०/२०१६ मधील निदेशानुसार लिपिक वर्गीय पदे नियमातील तरतुदीनुसार जाहिरात विज्ञापित करुन त्रयस्थ यंत्रणेमार्फत भरणेबाबत सर्व विभागीय कृषि सहसंचालक यांना दिनांक ०८/१२/२०१६ रोजीचे पत्रान्वये कळविण्यात आलेले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कळसुली ग्रामपंचायत (ता.कणकवली) अंतर्गत देवऋषीवाडी शेजारील बौध्दवाडी (कदमवस्ती) येथील रस्त्याचे बांधकाम करण्याबाबत

**(२९) २९१९७ (१५-०४-२०१७). ॲड.निरंजन डावखरे, श्री.नरेंद्र पाटील, श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.सतिश चव्हाण : तारांकित प्रश्न क्रमांक २३५६२ ला दिनांक १३ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सिंधुदूर्ग जिल्हयातील कळसुली ग्रामपंचायत (ता.कणकवली) अंतर्गत देवऋषीवाडी शेजारील बौध्दवाडी (कदमवस्ती) येथून मुख्य रस्त्यापर्यंत जाण्यास वाहतूक रस्ता नसल्याने तेथे रस्ता तयार करण्याची मागणी मौजे बौध्दवाडीतील (कदमवस्ती) ग्रामस्थ गेल्या अनेक वर्षांपासून शासनाकडे करीत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, बौध्दवाडी (कदमवस्ती) ते मुख्य रस्त्यापर्यंतच्या रस्त्याचे बांधकाम करण्यासंदर्भात ग्रामस्थांनी गटविकास अधिकारी, पंचायती समिती, कणकवली, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग, जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग तसेच मा.ग्रामविकास मंत्री यांच्याकडे माहे फेब्रुवारी, २०१६ मध्ये व त्यानंतर माहे मे, २०१६ मध्ये विनंती अर्ज सादर करुनही अद्याप कोणतीही कार्यवाही झालेली नसल्याचे दिनांक २ फेब्रुवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, ग्रामस्थांची मुख्य मागणी रस्ता बांधकाम करण्याची असताना त्याऐवजी सरंक्षक भिंत अर्धवट स्थितीत बांधलेली असून त्यासाठी किती निधी प्राप्त झाला होता व प्रत्यक्षात किती खर्च झाला,

(४) असल्यास, बौध्दवाडी (कदमवस्ती) येथील रस्ता बांधकाम तातडीने सुरु करण्याप्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे तसेच त्याबाबतची सद्य:स्थिती काय आहे ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०५-०१-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) अशी बाब नाही.

(३) सदर रस्त्यालगत वहाळ असल्याने रस्ता वाहून जाऊ नये म्हणून ८१.५० मीटर लांबीची संरक्षक भिंत बांधण्यात आली आहे. त्यापैकी ३१.५० मीटर संरक्षक भिंत ग्रामपंचायत मार्फत अनु. जाती व नवबौध्द घटकांच्या वस्तीचा विकास करणे या योजनेंतर्गत ग्रामपंचायतीस प्राप्त रुपये ४.५० लक्ष मधून बांधकाम करण्यात आलेले आहे. उर्वरीत ५० मीटर संरक्षक भिंतीचे बांधकाम हे ग्रामपंचायतीने सन २००३-०४ मध्ये संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना ५० टक्के मागासवर्गीय योजनेमधून करण्यात आलेले आहे. या कामाचे अंदाजपत्र रुपये २,४३,२८३ /- असून प्रत्यक्ष खर्च रुपये २,१८,३८०/- इतका झालेला आहे. संरक्षक भिंतीचे बांधकाम अर्धवट स्थितीत झालेले नाही.

(४) कळसुली देवऋषी मुख्य रस्त्यापासून ९५ मीटर रस्ता डांबरीकरण करण्यात आलेला आहे. त्यापुढील ३५ मीटर लांबीच्या रस्त्याला संबंधित ग्रामस्थाचे संमत्तीपत्र नसल्याने सदरचा रस्ता करता आलेला नाही. संमत्तीपत्र प्राप्त झाल्यानंतर ग्रामपंचायतीमार्फत पुढील कार्यवाहीचे नियोजन आहे.

---

**महाराष्ट्रातील महानगरपालिका व नगरपालिकांमधील कंत्राटी काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांना नोकरीत कायमस्वरुपी सामावून घेण्याबाबत**

**(३०) ३०२३३ (०४-०८-२०१२). श्री.गोपिकिशन बाजोरिया :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील महानगरपालिका व नगरपालिकांमध्ये कंत्राटी स्वरुपाचे कामे करणाऱ्या सर्व प्रवर्गातील कर्मचाऱ्यांची एकूण संख्या किती आहे,

(२) सदर कंत्राटी पध्दतीने काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांना शासनाच्या सेवेत कायमस्वरुपी सामावून घेणे शासनाच्या विचाराधीन आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या दृष्टीने शासनातर्फे कोणत्या स्वरुपाची कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-०१-२०१८) :** (१) महानगरपालिकांच्या स्तरावर तात्कालिक आवश्यकता विचारात घेऊन कामाच्या स्वरुपानुसार मर्यादित कालावधीसाठी निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात कंत्राटी कर्मचाऱ्यांची नेमणूक करण्यात येते. यामुळे कार्यरत कंत्राटी कर्मचाऱ्यांची निश्चित संख्या परिगणित करता येत नाही.

तथापि, २५ महानगरपालिकाकडून वेळोवेळी प्राप्त माहितीनुसार सुमारे १५,७८८ कंत्राटी कर्मचारी कार्यरत आहेत.

(२), (३) व (४) मा.सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश विचारात घेता नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडील कंत्राटी कर्मचाऱ्यांना सेवेत कायमस्वरुपी सामावून घेण्याचा प्रस्ताव विचाराधीन नाही.

---

## मालेगांव (जि.नाशिक) येथे नविन बसस्थानक निर्माण करण्याबाबत

**(३१) ३१०५९ (०७-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मालेगांव (जि.नाशिक) शहर व तालुक्यातील वाढलेली लोकसंख्येमुळे प्रवाशांकरिता उपलब्ध असलेले मध्यवर्ती बसस्थानकांची सुविधा अपुरी पडत असून मालेगांव येथे नवीन बसस्थानक निर्माण करण्याची मागणी होत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शहराचे विद्यमान मध्यवर्ती बसस्थानकावरून फेऱ्यांची असलेली मोठी संख्या तसेच कुसूंबा रोड पिवळा पंप भागात अत्यंत दाटीवाटी व प्रचंड रहदारीच्या ठिकाणी असलेले मध्यवर्ती बसस्थानक अत्यंत अडचणीचे व सुरक्षित वाहतुकीचेदृष्टीने धोकादायक ठरले असून बसस्थानक परिसरात वारंवार होणारे अपघात व त्यात ओढवणारे मृत्यू व त्यामुळे कायदा व सुव्यवस्थेची परिस्थिती निर्माण होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार मालेगाव येथे नवीन बसस्थानक निर्माण करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (०४-०१-२०१८) :** (१) होय.

(२) व (३) राज्य परिवहन महामंडळाद्वारे मालेगांव शहराच्या पश्चिमेस नवीन बसस्थानकासाठी स.नं. २३७ मधील ८ एकर जागेचा प्रस्ताव अप्पर जिल्हाधिकारी, मालेगांव यांना दिलेला होता. तथापि, दिनांक २६/११/२००८ रोजी अप्पर जिल्हाधिकारी, मालेगांव यांचे बैठकीत स.नं. २३७ वर जिल्हा न्यायालयाचे आरक्षण असल्याचे स्पष्ट झाले. जिल्हा न्यायालयास सदर स.नं. २३७ मध्ये इमारत बांधावयाची नसल्याने, सदर जागेवर जरी न्यायालयाचे आरक्षण असले तरी, राज्य परिवहन महामंडळाला देणेबाबत दिनांक २२/०५/२००९ रोजी विनंती केली असता, सदर जागा न्यायालयाने राज्य परिवहन महामंडळास देण्यास नकार दिलेला आहे. त्यामुळे नवीन बसस्थानक व आगाराचा प्रश्न प्रलंबित असल्याने अन्य पर्यायी जागा शोधण्याचे आदेश महामंडळास देण्यात आलेले आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील धरणातील गाळ काढून तो शेतामध्ये वापरण्याच्या योजनेच्या अंमलबजावणीबाबत

**(३२) ३११३५ (११-०८-२०१७). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील लहान धरणातील पाण्याच्या साठवण क्षमतेत वाढ करण्यासाठी धरणांतील गाळ काढून तो शेतामध्ये वापरण्याची योजना शासनाने आखल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०१-०१-२०१८) :** (१) राज्यातील मोठया पाटबंधारे प्रकल्पातून गाळ व गाळमिश्रीत वाळू/रेती निष्कासनाबाबत धोरण दिनांक ०४ मे, २०१७ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केले आहे. तसेच राज्यातील जलसंपदा विभागांतर्गत मध्यम व लघु पाटबंधारे प्रकल्पाचे धरणातील गाळ/गाळमिश्रीत रेती/वाळू निष्कासनाबाबतचे धोरण दिनांक २४ मे, २०१७ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केले आहे.

(२) व (३) सदर शासन निर्णयानुसार कार्यवाही सुरु असतानाच, शासन निर्णयाच्या अंमलबजावणी बाबत मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे रिट पिटीशन क्र. १०३११/२०१७ दाखल होऊन सदर निर्णयाच्या प्रक्रियेस स्थगिती दिलेली आहे. मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अनुषंगाने पुढील योग्य ती कार्यवाही करण्याची तजवीज ठेवली आहे.

___________

## मराठवाड्यात गारपीट व वादळी वाऱ्यांमुळे नुकसानग्रस्त शेतकऱ्यांना मदत देण्याबाबत

**(३३) ३१६७१ (०७-०८-२०१७). श्री.धनंजय मुंडे, श्री.जयवंतराव जाधव, श्री.सुनिल तटकरे, श्री.हेमंत टकले, श्री.अमरसिंह पंडित, श्री.सतिश चव्हाण, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील मराठवाड्यातील बीड, लातूर, उस्मानाबाद, परभणी, नांदेड, अहमदनगर व सोलापूर या जिल्हयात माहे मार्च, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान गारपीट आणि वादळी पाऊसामुळे शेतकऱ्यांच्या रब्बी पीकांचे, फळ बागांचे मोठ्या प्रमाणावर नुकसान झाले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या नुकसानीचे अद्याप पंचनामे आणि नुकसान भरपाई मिळालेली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने नुकसानग्रस्त शेतकऱ्यांना नुकसान भरपाई देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०४-०१-२०१८) :** (१) माहे मार्च, २०१७ मध्ये वा त्यासुमारास गारपीट आणि वादळी पावसामुळे मराठवाड्यातील बीड, लातूर, उस्मानाबाद, सोलापूर व राज्यातील इतर काही जिल्हयांत शेतीपिकांचे व फळपिकांचे नुकसान झाले असल्याचे निदर्शनास आले आहे.

(२) व (३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, दिनांक ०६ मे, २०१७ अन्वये चंद्रपूर जिल्हयासह राज्यात माहे मार्च, २०१७ या कालावधीत अवेळी पाऊस व गारपीट यामुळे झालेल्या शेतीपिकांच्या नुकसानीवर बाधित शेतकऱ्यांना मदत देण्याबाबतचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ठाणे व पालघर जिल्हयात आदिवासींच्या जमिनीवर झालेले अतिक्रमण

**(३४) ३२०४३ (३१-०७-२०१७). ॲड.जयदेव गायकवाड :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे व पालघर जिल्ह्यात आदिवासींच्या जमिनीवर राजकीय नेते, अधिकारी आणि व्यापारी यांनी मोठया प्रमाणात अतिक्रमणे केली असल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार ठाणे व पालघर जिल्हयातील अतिक्रमणे निष्कासित करुन आदिवासींच्या जमिनी आदिवासीना देणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०४-०१-२०१८) :** (१), (२) व (३) ठाणे आणि पालघर जिल्ह्यातील आदिवासींच्या काही जमिनीवर अतिक्रमण झाल्याचे निदर्शनास आले असून त्यानुषंगाने प्राप्त तक्रारीवर महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ चे कलम ५९, तसेच महाराष्ट्र अनुसूचित जमातींना जमिनी प्रत्यार्पित करणे अधिनियम, १९७४ चे कलम ४ अन्वये सुनावणी घेऊन नियमानुसार अतिक्रमण निष्कासनाची कार्यवाही करण्यात येत आहे.

---

## नालासोपारा (जि.पालघर) येथील तुळीज स्मशानभूमीत वीज, पाणी याची सोय करणेबाबत

**(३५) ३२३३८ (११-०८-२०१७). श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नालासोपारा (जि.पालघर) येथील तुळीज स्मशानभूमीत वीज, पाणी याची सोय नसल्याने अंत्यविधीसाठी आलेल्या नागरिकांची गैरसोय होत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रकरणी शासनामार्फत पाहणी केली आहे काय, पाहणीचे निष्कर्ष काय आहेत व त्यानुसार सदर स्मशानभूमीत वीज, पाणी याची सोय करुन अंत्यविधीसाठी येणाऱ्या नागरिकांची गैरसोय दूर करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-०१-२०१८)** : (१) व (२) वसई-विरार शहर महानगरपालिका हद्दीतील नालासोपारा (पु.) तुळीज येथे जूनी स्मशानभूमी अस्तित्वात असून सदर स्मशानभूमीत वीज व पाणी पुरवठ्याची सोय आहे असे आयुक्त, वसई-विरार महानगरपालिका यांनी कळविले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अमरावती विभागातील वाशिम, बुलढाणा व अकोला जिल्ह्यात नापिकी व कर्जबाजारीपणामुळे शेतकऱ्यांनी आत्महत्या केल्याबाबत

**(३६) ३२३९४ (०७-०८-२०१७). श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले** : सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अमरावती विभागातील वाशिम, बुलढाणा व अकोला जिल्ह्यात सन २०१६-१७ या वर्षात ३५४ शेतकऱ्यांनी नापिकी व कर्जबाजारीपणामुळे आत्महत्या केल्याचे दिनांक २१ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर आत्महत्याग्रस्त कुटुंबियांच्या वारसांना कोणती आर्थिक मदत केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०५-०१-२०१८) :** (१) जानेवारी ते ऑगस्ट, २०१७ अखेरपर्यन्त ३४६ आत्महत्यांपैकी १५२ प्रकरणे सध्या पात्र ठरली आहेत.

(२) होय, शासन निर्णय क्र.एससीवाय-१२०५/प्र.क्र.१८९/म-७, दिनांक २३ जानेवारी, २००६ नुसार सर्व पात्र प्रकरणी शासन निकषान्वये रुपये १.०० लक्ष प्रमाणे आर्थिक मदत वितरीत करण्यात आलेली आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अलिबाग (जि.रायगड) येथे नवीन कारागृह बांधणेबाबत

**(३७) ३२४७३ (११-०८-२०१७). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रायगड जिल्ह्याचे मुख्यालय अलिबाग येथे असलेल्या कारागृहाची क्षमता ८२ कैदी इतकी असतांना कारागृहात १४९ कैद्यांचा समावेश केल्याने कारागृहाची जागा अपुरी पडत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कैद्यांच्या क्षमतेनुसार शासन नवीन कारागृह बांधणेबाबत मान्यता देणार आहे काय,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-०१-२०१८) :** (१) होय.

(२) रायगड जिल्हयाचे मुख्यालय अलिबाग शहराच्या ५ कि.मी. परिसरात २५ ते ३० एकर शासकीय जागा उपलब्ध नसल्याने, नवीन कारागृह बांधण्याकरीता जागा उपलब्ध झालेली नाही. जागा उपलब्ध झाल्यास अलिबाग येथे नवीन कारागृह निर्मिती संदर्भात आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कर्जत (जि.रायगड) तालुक्यातील खाजगी क्षेत्रातील खरेदीदारांनी शेतकऱ्यांना सोयी-सुविधा नष्ट केल्याबाबत

**(३८) ३२५४७ (०६-०८-२०१७). श्री.बाळाराम पाटील** : सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कर्जत (जि.रायगड) तालुक्यातील अनेक गावातील शेतकऱ्यांच्या उत्पन्नाखालील जमिनी खाजगी क्षेत्रातील लोकांनी खरेदी करून सदर जमिनीवर बुलडोझरचा वापर करून ग्रामस्थांसाठी असलेल्या पाणीपुरवठा योजनेचा पाईप व वाहतुकीसाठी असलेल्या रस्ता इ. सोयी-सुविधा नष्ट केल्यामुळे त्याबाबत ग्रामस्थांनी तहसिलदार, कर्जत यांच्याकडे लेखी तक्रार करून संबंधितांवर कारवाई न केल्यास आंदोलन करण्याचा इशारा दिला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार शासकीय योजनांचे नुकसान करणाऱ्या जमीन मालकावर कारवाई करून नुकसान भरपाई देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०७-१२-२०१७) :** (१) ग्रामपंचायत कोल्हारे यांनी दिनांक २३/०५/२०१७ रोजीच्या पत्रान्वये ग्रामपंचायत कोल्हारे हद्दीतील नेरळ विकास प्राधिकरण हद्दीत अनेक बिल्डरांच्या इमारतींचे बांधकाम जिल्हा परिषद प्राधिकरणाच्या परवानगीने चालू असून, अनेकांनी भराव टाकले असून, पावसाचे पाणी येण्या-जाण्यासाठी नाला/वाट ठेवली नसल्यामुळे पावसाळ्यात पूर सदृश्य परिस्थिती निर्माण होण्याची शक्यता असल्यामुळे, याबाबत योग्य ती समज देऊन कार्यवाही करणेबाबत तहसिलदार, कर्जत यांचे कार्यालयास कळविले आहे. तसेच, ग्रामपंचायत कोल्हारे यांनी संबंधित विकासकांना आवश्यक कार्यवाही करण्यासाठी कळविले आहे.

(२) व (३) तहसिलदार, कर्जत यांचे कार्यालयाच्या दिनांक ०७/०७/२०१७ रोजीच्या पत्रान्वये नेरळ विकास प्राधिकरण यांना विकासकांनी अनधिकृत भराव टाकून बुजविलेल्या नाल्याच्या अनुषंगाने नियमोचित कार्यवाही करणेबाबत कळविण्यात आले आहे.

तसेच, दिनांक १०/०७/२०१७ रोजीच्या पत्रान्वये संबंधित विकासकांविरुद्ध नियमानुसार कारवाई करणेबाबत ग्रामपंचायत कोल्हारे यांना कळविण्यात आले आहे.

ग्रामपंचायत कोल्हारे यांच्या तक्रारीच्या अनुषंगाने चौकशी करण्यासाठी जिल्हा परिषदेच्या दिनांक २४/०७/२०१७ रोजीच्या आदेशान्वये नियुक्त करण्यात आलेल्या चौकशी समितीचा अहवाल प्राप्त झाला असून, त्याप्रमाणे संबंधित विकासकांना MRTP ॲक्ट १५३ (१) अन्वये कारवाईच्या नोटीसा देण्यात आल्या आहेत.

---

**राज्यातील १०० शाळांना आंतरराष्ट्रीय दर्जा देण्याबाबत**

**(३९) ३२८९२ (११-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक २८६४६ ला दिनांक २० मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील १०० शाळा पुढील दोन वर्षात आंतरराष्ट्रीय दर्जाच्या करण्यासंदर्भातील शासनाचा विचार पुर्ण झाला आहे काय,

(२) असल्यास, प्रस्तुत योजनेच्या कृती आराखड्याचे सर्वसाधारण स्वरुप काय आहे व यानुसार राज्यातील कोणत्या शाळांचा समावेश करण्यात आला आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कृती आराखड्यात समाविष्ट शाळांचा विकास करण्यासाठी निधी उपलब्ध होण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, प्रश्नोक्त प्रस्तावावरील शासनाचा विचार केव्हापर्यंत पुर्ण होणे अपेक्षित आहे ?

**श्री.विनोद तावडे (०६-०१-२०१८) :** (१) होय.

(२), (३) व (४) प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

---

## सार्वजनिक प्रकल्प उभारणीसाठी शासकीय जमिनीचा ताबा आगाऊ देण्याबाबत

**(४०) ३२९८७ (०७-०८-२०१७). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य शासनाच्या महत्वाच्या सार्वजनिक प्रकल्पांच्या उभारणीसाठी शासकीय जमिनीचा आगाऊ ताबा देण्याबाबतचा निर्णय माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयामध्ये कोणकोणत्या प्रकल्पाचा समावेश करण्यात आला आहे,

(३) असल्यास, सदर निर्णयाची अंमलबजावणी केव्हापासून होणार आहे ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०३-०१-२०१८) :** (१) शासन निर्णय क्रमांक : जमीन - २०१५ /प्र.क्र.४५/ज-१, दिनांक १ जून, २०१७ अन्वये शासनस्तरावरुन प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या महत्वाच्या प्रकल्पांना आवश्यक शासकीय जमिनींचा आगावू ताबा देण्याबाबतचे धोरण निश्चित करण्यात आले आहे.

(२) मंत्रिमंडळाने किंवा मंत्रिमंडळ उपसमितीने दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने शासनस्तरावरुन प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या सार्वजनिक वाहतुकीशी निगडीत मोठे प्रकल्प, मोठे/मध्यम सिंचन प्रकल्प व जलविद्युत प्रकल्प, मोठे पाणीपुरवठा प्रकल्प, पर्यटन विकास महामंडळाचे किंवा पर्यटन संचालनालयाचे मोठे पर्यटन प्रकल्प व महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळामार्फत विकसित करावयाचे औद्योगिक क्षेत्र या निकडीच्या सार्वजनिक प्रकल्पांचा उक्त धोरणात समावेश आहे.

(३) ज्या निकडीच्या सार्वजनिक प्रकल्पांना या शासन निर्णयापूर्वीच मंत्रिमंडळ किंवा मंत्रिमंडळ उपसमितीने मान्यता दिली असून अद्याप शासकीय जमिनीचा आगाऊ ताबा प्राप्त झाला नसेल अशा प्रकल्पांना तसेच १ जून, २०१७ नंतर अशी मान्यता मिळालेल्या प्रकल्पांना प्रस्तुत धोरण लागू राहील.

---

## राज्यात मुलींच्या वसतिगृहासाठी जागा उपलब्ध करुन देण्याबाबत

**(४१) ३३०७७ (११-०८-२०१७). डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियनांतर्गत राज्यात ५ वर्षापूर्वी आखण्यात आलेल्या वसतिगृह बांधकाम योजनेत अजूनही अडथळे कायम असून सहा ठिकाणी मुलींच्या वसतिगृहासाठी शासकीय जमीनच मिळाली नसल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन मुलींच्या वसतिगृहासाठी जागा उपलब्ध करुन देण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०६-०१-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) संबंधित जिल्ह्याचे मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद तसेच शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद यांना सदर गटामधील मुलींच्या वसतिगृहाकरिता जागा उपलब्ध करुन देणेबाबत निर्देश देण्यात आलेले आहेत.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत पहिल्या टप्प्या त रस्ते बांधण्याच्या निर्णयाबाबत

**(४२) ३३२८६ (१८-०८-२०१७). श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.सुनिल तटकरे, श्री.विक्रम काळे, श्री.अमरसिंह पंडित, श्री.सतिश चव्हाण, डॉ.सुधीर तांबे, श्री.दत्तात्रय सावंत : दिनांक ३ ऑगस्ट, २०१६ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ३ मधील प्रश्न क्रमांक १४८६८ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेतून राज्यात पहिल्या टप्प्यात ५ हजार २०० कि.मी. रस्ते बांधण्याचा निर्णय शासनाने माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेचे स्वरूप काय आहे,
(३) असल्यास, पहिल्या टप्प्यात कोणकोणत्या जिल्हयांच्या रस्त्यांची कामे हाती घेण्यात आली व त्याकरिता किती खर्च अपेक्षित आहे ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०६-०१-२०१८) :** (१) मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेतून राज्यात पहिल्या टप्प्यात २००० कि.मी. व दुसऱ्या टप्प्यात ५२०० कि.मी. ग्रामीण भागातील दुरवस्था झालेल्या रस्त्यांची दर्जोन्नती करण्याचा निर्णय शासनाने माहे डिसेंबर, २०१५ मध्ये घेतला आहे.
(२) महाराष्ट्र राज्यातील न जोडलेल्या वाडया-वस्त्या जोडणे व ग्रामीण भागातील दुरवस्था झालेल्या रस्त्यांची दर्जोन्नती करणे हे मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेचे स्वरुप आहे.
(३) पहिल्या टप्प्यात सर्व जिल्हयात रस्त्याची कामे सुरु करण्यात आली आहेत.

---

## हिंगोली जिल्हयात सिंचन क्षेत्र वाढविण्यासाठी “गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार “ योजना कार्यान्वित करण्याबाबत

**(४३) ३३३१६ (११-०८-२०१७). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शासनाने हिंगोली जिल्हयात सिंचन क्षेत्र वाढविण्यासाठी “गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार” ही योजना सुरु केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या योजनेचे सर्वसाधारण स्वरुप काय आहे व या योजनेचा फायदा किती शेतकऱ्यांनी घेतला आहे,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर योजना यशस्वी करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (११-१२-२०१७) :** (१) होय.
(२) राज्यातील धरणामधील गाळ काढणे व तो शेतामध्ये वापरणे यासाठी गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार योजना राबविण्यास शासन निर्णय दिनांक ०६/०५/२०१७ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. पुढील ४ वर्षामध्ये २५०

हे.पेक्षा कमी लाभक्षेत्र असलेल्या ८२,१५६ धरणांपैकी ३१,४५९ धरणांमधील अंदाजे ५.१८ लक्ष स.घ.मी.एवढा गाळ उपसा करुन शेतात पसरविणे अपेक्षित आहे. सदर योजनेची अंमलबजावणी सुरु असून अदयापपर्यंत एकूण १९७८ धरणामधील अंदाजे ९२ लक्ष घ.मी.गाळ उपसा केला असून एकूण ९०६३ शेतकरी, ५५ स्वयंसेवी संस्था व ४३३ ग्रामपंचायतींनी योजनेत सहभाग घेतला आहे.
(३) प्रचार प्रसिध्दिच्या माध्यमातून जनजागृती केली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## भिवंडी (जि.ठाणे) येथील कोटरगेट मशिदीसमोरील सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मालकीच्या जागेत पोलीस स्टेशन बांधण्याबाबत

**(४४) ३३५९१ (११-०८-२०१७). श्री.नरेंद्र पाटील, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, अ‍ॅड.राहुल नार्वेकर, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) भिवंडी (जि.ठाणे) येथील कोटरगेट मशिदीसमोरील सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मालकीच्या जागेत पोलीस स्टेशन बांधण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने पोलीस स्टेशन बांधण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-०१-२०१८) :** (१) होय.
(२) सार्वजनिक बांधकाम विभागाकडून सदर जागा पोलीस विभागाच्या नावे वर्ग होणेबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाने मान्यता दिली असून जिल्हाधिकारी, ठाणे यांचेकडे प्रत्यार्पित करण्यात येत आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## धाराशीव येथील जिल्हा परिषद सेवेत कार्यरत असलेल्या ६२६ शिक्षकांना वरिष्ठ वेतनश्रेणी लागू करण्याच्या मागणीसाठी शिक्षकांनी केलेले उपोषण

**(४५) ३३७१२ (११-०८-२०१७). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) धाराशीव येथील जिल्हा परिषद सेवेत कार्यरत असलेल्या ६२६ शिक्षकांना वरिष्ठ वेतनश्रेणी तात्काळ लागू करावयाच्या मागणीसाठी प्राथमिक शिक्षक संघाच्यावतीने माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान जिल्हा परिषदेसमोर उपोषण सुरु करण्यात आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शिक्षकांना वरिष्ठ वेतनश्रेणी लागू करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०३-०१-२०१८) :** (१) होय.

(२) जिल्हा परिषद, धाराशीव अंतर्गत एकूण ६२७ शिक्षकांना वरिष्ठ वेतनश्रेणी मंजूरीसाठी दिनांक २२/०५/२०१७ रोजी चटोपाध्याय वेतनश्रेणी मुल्यमापन समितीसमोर प्रस्ताव सादर करण्यात आला होता. समितीने ६२७ पैकी एकूण ५९१ शिक्षकांना चटोपाध्याय वरिष्ठ वेतनश्रेणी मंजूर केली असून उर्वरित ३६ शिक्षकांना संगणक परिक्षा उत्तीर्ण नसणे, गोपनीय अहवाल उपलब्ध नसणे, १२ वर्षे अखंडीत सेवा पुर्ण नसणे इत्यादी त्रुटींची पुर्तता करण्यासाठी चटोपाध्याय वरिष्ठ वेतनश्रेणी मंजूर केलेली नाही. त्रुटींची पुर्तता होताच उर्वरित ३६ शिक्षकांनाही चटोपाध्याय वरिष्ठ वेतनश्रेणीचा लाभ मंजूर करणे शक्य आहे. तसेच ५९१ शिक्षकांना चटोपाध्याय वरिष्ठ वेतनश्रेणी मंजूरीचे आदेश दिनांक २१/०६/२०१७ रोजी संबंधित गट शिक्षण अधिकारी यांच्यामार्फत संबंधितास, संबंधित मुख्याध्यापक यांना निर्गमित करण्यात आले आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कळंब तालुक्यात सामाजिक वनीकरण विभागाने वृक्षलागवडीचे प्रस्तावातील त्रुटींबाबत

**(४६) ३३७७३ (१८-०८-२०१७). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कळंब तालुक्यात सामाजिक वनीकरण विभागाने महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत वृक्षलागवडीचे सादर केलेल्या सर्व प्रस्तावात उपविभागीय अधिकाऱ्यांनी त्रुटी काढल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त योजनेंतर्गत किती वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट होते,

(३) तसेच सामाजिक वनीकरण विभागाने सादर केलेल्या प्रस्तावात कोणत्या त्रुटी काढण्यात आल्या आहेत व त्यांचे स्वरुप काय आहे,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून प्रस्तावातील त्रुटीचे निराकरण करण्यासाठी कोणती कार्यवाही केली व करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०३-०१-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजना अंतर्गत सन २०१७ पावसाळयामध्ये एकूण २०,००० रोपे लागवडीचे उद्दिष्ट होते.

(३) अंदाजपत्रकास जिल्हास्तरीय छाननी समितीकडून मान्यता देण्यात आलेली आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सन २००५ नंतरच्या निवृत्तीधारकांच्या कुंटुंबियांना अंशदायी निवृत्तीवेतनाचा लाभ देण्याबाबत

**(४७) ३३९७१ (११-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **वित्त मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात दिनांक १ नोव्हेंबर २००५ नंतर सेवेत लागलेल्या कर्मचाऱ्यांना नवीन अंशदायी निवृत्तीवेतन योजना लागू करण्यात आली असून निवृत्तीधारकाचा मृत्यू झाल्यास त्यांच्या कुटुंबियांस सदर निवृत्तीचा लाभ देण्यात येत नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर निवृत्तीधारकाचा मृत्यू झाल्यास त्यांच्या कुटुंबाचे हाल होत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर अंशदायी निवृत्तीवेतनाचा लाभ त्यांच्या कुटुंबियांना देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०४-०१-२०१८) :** (१), (२) व (३) नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या तरतुदीनुसार सद्य:स्थितीमध्ये या योजनेचे सदस्य असलेले कर्मचारी सेवेत असताना मृत पावल्यास त्यांच्या कुटुंबियांना कोणतेही निवृत्तीवेतन विषयक लाभ देण्यात येत नाहीत. अशा कुटुंबियांना तोंड द्यावे लागणाऱ्या समस्या विचारात घेऊन शासनाने परिभाषित अंशदायी निवृत्तीवेतन योजनेचा सदस्य असलेल्या कर्मचाऱ्यांचा सेवेत असताना मृत्यू झाल्यास त्याच्या कुटुंबियांना लाभ देण्यासंदर्भात शिफारशी करण्यासाठी दिनांक १३/०७/२०१६ च्या शासन निर्णयान्वये मा.मंत्री (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमली. या समितीने केलेल्या शिफारशी शासनास प्राप्त झाल्या असून सदर शिफारशी संदर्भात योग्य तो निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात भाकड गायी, निरुपयोगी बैलाच्या संगोपणासाठी गोवंश केंद्र उभारण्याबाबत

**(४८) ३४११० (०७-०८-२०१७). श्री.हेमंत टकले, श्री.सुनिल तटकरे : तारांकित प्रश्न क्रमांक १५१६९ ला दिनांक ४ एप्रिल, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **पशुसंवर्धन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात भाकड गायी, निरुपयोगी बैलाच्या संगोपणासाठी गोवंश सेवा केंद्र उभारण्याचा निर्णय शासनाने माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (०८-०१-२०१८) :** (१) व (२) होय.
(i) राज्यात दिनांक ४ मार्च, २०१५ पासून महाराष्ट्र प्राणी रक्षण (सुधारणा) अधिनियम, १९९५ लागू करण्यात आला आहे. या कायद्यानुसार संपूर्ण गोवंशीय जनावरांच्या कत्तलीवर प्रतिबंध करण्यात आलेला आहे. त्यामुळे, यापुर्वी शेतकामासाठी,ओझी वाहण्यासाठी व पैदाशीसाठी उपयुक्त नसलेले गोवंशीय बैल व वळू यांच्या कत्तलीवर बंदी घालण्यात आलेली आहे. तसेच, गाय, बैल, वळू यांच्या कत्तलीसाठी परराज्यात करावयाची वाहतुक व तद्नुषंगीक खरेदी/ विक्री करण्यास देखील प्रतीबंध करण्यात आलेला आहे. त्यामुळे, कालांतराने शेती व दूध यासाठी अनुत्पादक असलेल्या गोवंशीय पशुधनाच्या संख्येत वाढ होणार आहे.
(ii) या सर्व गोवंशाचा सांभाळ (भाकड गाई, अनुत्पादक/ निरुपयोगी बैल, वळू इ.) करण्यासाठी गोशाळांना अर्थसहाय्य देण्यासाठी राज्यस्तरीय योजने अंतर्गत "गोवर्धन गोवंश सेवा केंद्र" ही नवीन योजना सन २०१७-१८ या आर्थिक वर्षामध्ये राज्यातील मुंबई व मुंबई उपनगर हे २ जिल्हे वगळता उर्वरीत ३४ ग्रामीण जिल्ह्यात राबविण्यासाठी दिनांक २६ एप्रिल, २०१७ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्पामध्ये गतवर्षीच्या तुलनेत यावर्षीच्या व्याघ्र सर्वेक्षणामध्ये तफावत आढळल्याबाबत

**(४९) ३४३३५ (१८-०८-२०१७). प्रा.डॉ.तानाजी सावंत :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्पामध्ये गत वर्षीच्या सर्वेक्षणामध्ये ९१ वाघांची नोंद झाली होती मात्र या वर्षीच्या व्याघ्र सर्वेक्षणामध्ये फक्त ६२ वाघांची नोंद करण्यात आल्याने सदर सर्वेक्षणात २९ वाघांची तफावत चिंतादायक आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०५-०१-२०१८) :** (१) हे खरे नाही.

दर वर्षी बुध्दपोर्णिमेला होणाऱ्या पाणस्थळ प्रगणेत ताडोबा अंधारी व्याघ्र प्रकल्पामध्ये सन २०१६ मध्ये ८७ वाघ व २८ बिबटे तर सन २०१७ मध्ये ६२ वाघ व १९ बिबटे असल्याचे निदर्शनास आले आहे.

(२) व (३) पाणस्थळांवरील प्रगणनेच्या आधारावर वाघांची संख्या निश्चित होत नसल्याने पाणस्थळ प्रगणेत प्रगणकांना दिसलेल्या वाघांच्या संख्येच्या तुलनात्मक आधारावर वाघांची संख्या कमी झाली हे निष्कर्ष काढणे शास्त्रोक्त नसल्याने प्रकरणी चौकशी करण्याचा अथवा कार्यवाही करण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौजे साडेगांव येथे वि.जा.भ.ज माध्यमिक आश्रमशाळेस जोडून प्राथमिक आश्रमशाळेस मान्यता मिळण्याबाबत

**(५०) ३४५२९ (११-०८-२०१७). श्री.रामराव वडकुते : तारांकित प्रश्न क्रमांक २९४४५ ला दिनांक १४ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे साडेगांव येथे अहिल्यादेवी महिला व बालविकास मंडळ, पारवा या संस्थेने विशेष बाब म्हणून वि.जा.भ.ज. माध्यमिक आश्रमशाळेस जोडून प्राथमिक आश्रमशाळेस मान्यता मिळावी म्हणून स्थानिक लोकप्रतिनिधींकडून दिनांक १२ जानेवारी, २०१६ रोजी वा त्यासुमारास मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांना निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन माध्यमिक आश्रमशाळेस जोडून प्राथमिक आश्रमशाळेस मान्यता मिळण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (१९-१२-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) दिनांक ३१ मे, २००६ रोजीच्या शासन निर्णयान्वये नवीन आश्रमशाळा मंजुर न करण्याचे शासनाचे धोरण आहे.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**डॉ. अनंत कळसे**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रकिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मुद्रणालय, मुंबई.